**ई-प्रशासन पारितोषिक - प्रवर्ग निश्चित करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मातंसं/नस्ती ०९/प्र.क्र.४३/३९**

माहिती तंत्रज्ञान संचालनालयमंत्रालय,

मुंबई-४०००३२

तारीख: ७ जानेवारी, २०१५

वाचा -

1) **शासन निर्णय क्रमांकः मातंसं/नस्ती ०९/प्र.क्र.४३/३९, दिनांक ११/०८/२००९**
2) **शासन निर्णय क्रमांकः GAD-मतस०२३/२/२०१३-DIR-DIT(MH) दिनांक १७/०६/२०१३**

प्रस्तावना -

शासनामार्फत जनतेस पुरविल्या जाणाऱ्या सेवा-सुविधा पारदर्शकपणे अभिनव पद्धतीने, जलद गतीने, एकत्रितरित्या नजिकच्या ठिकाणी देणे उत्तम शासनाचे द्योतक आहे. यामुळे शासकीय सेवा अत्यंत वेगाने व स्वस्त दरात देतात येतात. ई-प्रशासनाच्या माध्यमातून महाराष्ट्र शासन जनतेस सेवा पुरविण्यासाठी अग्रेसर राहिले आहे. राज्यातील विविध शासकीय/निमशासकीय विभाग व संस्थांद्वारे ई-प्रशासनाच्या माध्यमातून प्रशासकीय गतिमानता आणण्यासाठी व ई-प्रशासनाला प्रोत्साहन देण्यासाठी स्पर्धात्मक ई-प्रशासन पारितोषक दरवर्षी दिली जातात. माहिती तंत्रज्ञानाचा प्रशासकीय कामकाजामध्ये जनहिताच्या दृष्टिने प्रभावी व यशस्वीपणे वापर करणाऱ्या शासन संस्थांना / घटकांना पुढील प्रवर्गांत उत्कृष्ट काम केल्याबद्दल निवड करण्यात येते.

१) सर्वोत्कृष्ट ई-गव्हर्नन्स (e-governance excellence award)
२) ई-गव्हर्नन्स सहाय्याने कार्यपद्धतीत उत्कृष्ट बदल (Excellence in Process Re-engineering)
३) ई-गव्हर्नन्सद्वारे नागरीक केंद्रीत सुविधांचे उत्कष्ट प्रदान (Excellence in Citizen Centric Service Delivery)
४) उत्कृष्ट वेबसाईट / पोर्टल (Best website / portal)
५) माहिती तंत्रज्ञानाचा प्रशासनात अभिनव वापर (IT Innovator of the year)
६) माहिती तंत्रज्ञानाचा पर्यावरणासाठी वापर (IT for Environment Award).

प्रशासकीय कामकाजात बदलत्या आधुनिक तंत्रज्ञानाचा होत असलेला वापर आणि प्रशासनामध्ये होत असलेले बदल विचारात घेऊन ई-प्रशासन पुरस्कारांच्या प्रवर्गांमध्ये बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

जनहितासाठी प्रशासकीय कामकाजात गतिमानता आणण्यासाठी माहिती तंत्रज्ञानाचा प्रभावी व यशस्वी वापर करणाऱ्या शासकीय संस्थांना/घटकांना यापूर्वी सहा प्रवर्गांत पारितोषक प्रदान केले जात होते. त्याऐवजी आता पुढील सात प्रवर्गांत उत्कृष्ट कामाबाबत पारितोषक प्रदान केले जाईल.

| अ.क्र. | प्रवर्ग |
|---|---|
| १ | ई-प्रशासनाद्वारे कार्यपद्धतीत उत्कृष्ट बदल (Excellence in Government Process Reengineering) |
| २ | ई-प्रशासनाद्वारे नागरीक केंद्रीत उत्कृष्ट सुविधा प्रदान (Excellence in Citizen Centric Service Delivery) |
| ३ | उत्कृष्ट संकेतस्थळ / पोर्टल (Excellent Website/Portal) |
| ४ | "क्लाऊड फर्स्ट मोबाईल फर्स्ट" तंत्रज्ञानाचा प्रशासनात अभिनव अंगिकार (Innovative use of IT in Governance: Adoption of " Cloud First Mobile First Strategy" ) |
| ५ | माहिती तंत्रज्ञानाचा पर्यावरणासाठी वापर (हरित माहिती तंत्रज्ञान) - IT For environment (Green IT) |
| ६. | जीआयएस तंत्रज्ञान आधारित नकाशांचा वापर (Use of GIS Technology Maps ) |
| ७. | सोशल मिडियाचा वापर (Use of Social Media) |

मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील समितीपुढे विविध विभागांच्या प्रस्तावांची छाननी करण्यात येईल आणि प्रत्येक प्रवर्गाकरीता तीन प्रस्तावांची समितीद्वारे अंतिमत: निवड करण्यात येईल. या समितीचा निर्णय हा अंतिम व बंधनकारक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१०७१४५९१०६९११ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DESHMUKH DILIP P

Digitally signed by DESHMUKH DILIP P
DN: c=IN, o=Govt Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation, postalCode=400001, st=Maharashtra, cn=DESHMUKH DILIP P
Date: 2015.01.07 16:17:18 +05'30'

**( दि.प्र.देशमुख )**

अवर सचिव (मातं)

**प्रत,**

१. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
४. सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५. सर्व मंत्रालयीन विभाग,
६. मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
७. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
८. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा), मुंबई
९. महालेखापाल, महाराष्ट्र-२ ( लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
१०. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा), नागपूर
११. अधिदान व लेख अधिकारी, मुंबई,
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१३. मुख लेखा परीक्षक (निवासी लेखे), कोकण भवन, नवी मुंबई,
१४. सर्व विभागीय आयुक्त,
१५. सर्व जिल्हाधिकारी,
१६. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१७. सर्व महानगरपालिका आयुक्त/नगरपालिका मुख्याधिकारी
१८. सा.प्र.वि. कार्यासन-३९